कोरोना पार्श्वभूमीवर कलाकारांना
अर्थसहाय्य देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८८२०/प्र.क्र.१४७/सांका.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१

वाचा :- संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सां.का.सं./ ९३१/२०२०, दिनांक २० मे, २०२१

**प्रस्तावना:-**

देशात कोरोना विषाणूंचा प्रादूर्भाव झाल्याने संपूर्ण राज्यासह देशात लॉकडाऊन लागू होता. तसेच, लॉकडाऊन शिथील करण्यात आल्यानंतरही सांस्कृतिक कार्यक्रमाचे आयोजन, नाटयगृहे, चित्रपटगृहे यांच्यावर बंदी असल्याने कलाकारांना सुमारे दीड वर्षापर्यंत कला सादरीकरण व त्यातून होणारे उत्पन्न यापासून वंचित राहावे लागले. तसेच सांस्कृतिक कार्य विभागामार्फत आयोजित करण्यात येणारे सांस्कृतिक कार्यक्रमही या काळात स्थगित करण्यात आलेले होते. या काळात सांस्कृतिक व कलाक्षेत्रातील संघटीत व असंघटीत कलाप्रकारातील विविध कलाकार, ज्यांचे उपजीविकेचे साधन केवळ सांस्कृतिक कार्यक्रम व कला सादर करणे असे आहे, त्यांची आर्थिक कुचंबणा झाली आहे. इतर राज्यांमध्ये कलाकारांना कोरोनाच्या पार्श्वभूमीवर ठोक एकरकमी अनुदान देण्यात आलेले आहे. तसेच, राज्यातील विविध विभागांमार्फत कोरोनाच्या पार्श्वभूमीवर बाधित झालेल्या जनसामान्यांना आर्थिक सहाय्य करण्यात आलेले आहे, याच धर्तीवर राज्यातील संघटित व असंघटित क्षेत्रातील प्रयोगात्मक कलाप्रकारातील कलाकारांना शासनामार्फत आर्थिक मदत प्राप्त व्हावी, अशी मागणी लोकप्रतिनिधी, विविध संघटना, संस्था व कलाकार यांनी केली आहे. सदर मागणी विचारात घेऊन अशा कलाकारांना एकरकमी आर्थिक सहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील प्रयोगात्मक कलेच्या प्रकारातील कलाकार, कलासमुह यांना कोरोना संसर्गाच्या पार्श्वभूमीवर अर्थसहाय्य करण्यास तसेच स्थानिक प्रयोगात्मक कलेतील कलाकारांच्या व संस्थांच्या निवडीशी संबंधित प्रशासकीय खर्चास या शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे:-

**तक्ता - १**

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>लाभार्थी स्वरूप</th><th>अनुदान रक्कम (रुपये)</th><th>लाभार्थी कलाकार/पथके</th></tr>
<tr><td>अ</td><td>एकरकमी कोविड दिलासा पॅकेज</td><td>२८.०० कोटी</td><td>५६,००० कलाकार (प्रति कलाकार रु.५,०००/- प्रमाणे)</td></tr>
<tr><td>ब</td><td>समूह लोककलापथकांचे चालक/ मालक/ निर्माते/ यांना एकरकमी कोविड विशेष अनुदान पॅकेज</td><td>६.०० कोटी</td><td>८४७ कलापथके
<table>
<tr><td>अ. क्र.</td><td>लोककलेचा तपशील</td><td>संस्था संख्या</td><td>प्रति पथक प्रस्तावित अनुदान रुपये</td><td>एकूण अनुदान रक्कम रुपये</td></tr>
</table>
</td></tr>
</table>

<table>
<tr><td></td><td></td><td></td><td>
<table>
<tr><td>१.</td><td>शाहिरी</td><td>१००</td><td>५० हजार</td><td>५० लाख</td></tr>
<tr><td>२.</td><td>खडीगंमत</td><td>६०</td><td>१ लाख</td><td>६० लाख</td></tr>
<tr><td>३.</td><td>संगीत बारी</td><td>२००</td><td>५० हजार</td><td>१ कोटी</td></tr>
<tr><td>४.</td><td>तमाशा फड पूर्णवेळ</td><td>२५</td><td>२ लाख</td><td>५० लाख</td></tr>
<tr><td>५.</td><td>तमाशा फड हंगामी</td><td>८०</td><td>१ लाख</td><td>८० लाख</td></tr>
<tr><td>६.</td><td>दशावतार</td><td>४०</td><td>१ लाख</td><td>४० लाख</td></tr>
<tr><td>७.</td><td>नाटक</td><td>३५</td><td>२ लाख</td><td>७० लाख</td></tr>
<tr><td>८.</td><td>झाडीपट्टी</td><td>४०</td><td>१ लाख</td><td>४० लाख</td></tr>
<tr><td>९.</td><td>विधीनाटय</td><td>२१६</td><td>२५ हजार</td><td>५४ लाख</td></tr>
<tr><td>१०.</td><td>सर्कस</td><td>१</td><td>६ लाख</td><td>६ लाख</td></tr>
<tr><td>११.</td><td>टुरिंग टॉकीज</td><td>५०</td><td>१ लाख</td><td>५० लाख</td></tr>
<tr><td>एकूण</td><td></td><td>८४७</td><td></td><td>६ कोटी</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>क</td><td>प्रयोगात्मक कलेशी संबंधित स्थानिक लोक कलावंत व संस्था निवड विषयक प्रशासकीय खर्च</td><td>१.०० कोटी</td><td></td></tr>
<tr><td></td><td>एकूण मागणी</td><td>३५.०० कोटी</td><td></td></tr>
</table>

२. एकरकमी कोविड दिलासा पॅकेज यासाठी निवड पध्दती, कलाकाराने जोडावयाची कागदपत्रे, समितीची रचना व कार्यपध्दती या सोबतच्या **परिशिष्ट - अ** प्रमाणे राहील. लाभार्थ्यांनी करावयाच्या अर्जाचा नमुना **परिशिष्ट - ब** प्रमाणे राहील. जिल्हाधिकारी / संचालकांनी प्रसिध्द करावयाच्या जाहिरातील नमुना **परिशिष्ट-क** प्रमाणे राहील.

३. एकरकमी कोविड दिलासा पॅकेज (एकल कलाकार व समुह / संस्था / फड / निर्माते यांच्या निवडीसंदर्भात) जिल्हाधिकारी स्तर व सांस्कृतिक कार्य संचालनालय स्तरावर प्राप्त अर्जाची छाननी करण्याकरीता अनुक्रमे जिल्हाधिकारी आणि संचालक, सांस्कृतिक कार्य हे त्यांच्या स्तरावर छाननी समिती गठीत करतील. सदर योजनेची अंमलबजावणी हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ५० दिवसांच्या आत पूर्ण करण्यात यावी.

४. उपरोक्त तक्ता १ मधील निधीचा विनियोग खालीलप्रमाणे करण्यात यावा.

**तक्ता - २**

| | | |
|---|---|---|
| १. | एकल कलाकार समुह / संस्था इ. यांना अर्थसहाय्य | रुपये ३४.०० कोटी |
| २. | जिल्हाधिकारी यांच्याकडील पात्र कलाकार निवड विषयक प्रशासकीय खर्चासाठी वितरीत होणारा निधी एकूण रुपये ९९.०० लक्ष | प्रत्येक जिल्हयासाठी करण्यात येणाऱ्या रुपये २.७५ लक्ष इतक्या निधीचा विनियोग या योजनेंतर्गत खालील बाबींवर करण्यात यावा.<br>१. प्रशासकीय बाबी<br>२. स्टेशनरी खर्च<br>३. बैठक आयोजन<br>४. या प्रयोजनार्थ विविध बाबींवर होणारा अनुषंगिक खर्च |
| ३. | सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्याकडील पात्र संस्था निवड विषयक प्रशासकीय खर्चासाठी वितरीत होणारा निधी रुपये १.०० लक्ष | सदर निधी खालील प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावा.<br>१. प्रशासकीय बाबी<br>२. स्टेशनरी खर्च<br>३. बैठक आयोजन<br>४. या प्रयोजनार्थ विविध बाबींवर होणारा अनुषंगिक खर्च |

५. उपरोक्त परिच्छेद ४ मधील तक्ता क्र. २ मध्ये नमूद केलेल्या अ.क्र. २ व ३ वरील खर्च आवश्यकतेनुसार करण्याचे अधिकार अनुक्रमे जिल्हाधिकारी व संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना प्रदान करण्यात येत आहेत.

६. उपरोक्त परिच्छेद १ मधील तक्ता क्र. १ मध्ये नमूद खर्च खालील प्रमाणे व आवश्यकतेनुसार पुनर्विनियोजनाने भागविण्यात यावा:-

**अ.** अ.क्र. अ मधील एकल कलाकारांना एकरकमी कोविड दिलासा पॅकेज यावर होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, (०१) (०१) साहित्य, कला इ. क्षेत्रातील मान्यवर व्यक्तींना आर्थिक सहाय्य (२२०५ १९०१) ३१ सहाय्यक अनुदाने (अनिवार्य) या अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा.

**आ.** अ.क्र. ब मधील समूह लोककलापथकांचे चालक/ मालक/ निर्माते यांना एकरकमी कोविड विशेष अनुदान पॅकेज यावर होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, (०२) (०९) कला व संस्कृती संस्थांना सहाय्यक अनुदान (कार्यक्रम), (२२०५ १५३४) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा.

**इ.** अ.क्र. क मधील स्थानिक लोककलावंत सर्वेक्षण खर्च यावर होणारा खर्च मागणी क्र. झेडडी-२, (०२) (०२) राज्य, नृत्य, नाटय तमाशा व संगीत महोत्सव (कार्यक्रम), (२२०५ १५०७) ५० इतर खर्च या अंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतूदीतून भागविण्यात यावा.

**ई.** विचाराधीन बाबींवरील खर्च रु. ३५.०० कोटी या मर्यादेतच करण्यात येईल, याची दक्षता संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांनी घ्यावी.

७. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. वित्त विभागाकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन परिपत्रकातील सूचनांचे पालन करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

९. सदर खर्च, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १०७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ४९७/२१/व्यय-१५, दिनांक २५.०८.२०२१ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने मंजूर करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२१११०३१६३६१८८६२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS RAMRAO THORAT

Digitally signed by VILAS RAMRAO THORAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, pseudonym=2908C178C06A08E995849046F8BCFB7325B57851, serialNumber=CB03C92B399CC89310BF1378C184D97A4B7B9B98E926EA8E71DD7BC9CB273631, cn=VILAS RAMRAO THORAT
Date: 2021.11.03 18:46:49 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर
१२. अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
१३. निवड नस्ती, सां.का.४.

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८८२०/प्र.क्र.१४७/सांका.४, दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१**

**परिशिष्ट – अ**

**अ. निवड पध्दती व एकल कलाकाराने अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे :-**

एकल कलाकाराच्या निवडीसाठी जिल्हाधिकारी यांनी १) जिल्हा निवड समिती व २) छाननी समिती खालीलप्रमाणे गठीत करावी. सदर निवडीसाठी जिल्हाधिकारी कार्यालयाकडून वर्तमान पत्र / इतर प्रसार माध्यमांद्वारे जाहिरात देऊन संबंधित जिल्हयातील लाभार्थ्यांचे अर्ज विहित नमुन्यात मागविण्यात येतील. सदर अर्जाच्या छाननीसाठी जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या स्तरावर छाननी समिती गठीत करावी. सदर छाननी समितीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांच्यासह स्थानिक स्वराज्य संस्था यामधील गट-ब दर्जापेक्षा कमी नसतील, अशा आवश्यकतेनुसार अधिकाऱ्यांचा समावेश असेल. प्राप्त कागदपत्रांची छाननी सदर समितीद्वारे करण्यात येईल. छाननी समितीकडून पात्र अर्ज जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीसमोर निर्णयार्थ सादर करण्यात येतील.

**जिल्हास्तरीय निवड समितीची रचना** -

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३. | महापालिका आयुक्त/ मुख्याधिकारी, नगर पालिका / परिषद नगर पालिका / परिषद | सदस्य |
| ४. | जिल्हा माहिती अधिकारी | सदस्य |
| ५. | एन.आय.सी. चे अधिकारी | सदस्य |
| ६. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जि.प. | सदस्य |
| ७. | कला क्षेत्राशी निगडीत जिल्हयातील सन्माननीय कलाकार (एकूण १०) | सदस्य |
| ८. | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी | सदस्य सचिव |

➢ **अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे –**

- विहित नमुन्यातील अर्ज
- महाराष्ट्रात १५ वर्षे वास्तव्याचा रहिवासी दाखला (स्थानिक स्वराज्य संस्थेचा दाखलाही ग्राहय)
- तहसिलदारांकडून प्राप्त उत्पन्नाचा दाखला
- कलेच्या क्षेत्रात १५ वर्षे कार्यरत असल्याबाबतचे पुरावे
- आधार कार्ड व बँक खाते तपशील
- शिधापत्रिका सत्यप्रत
- जिल्हा स्तरावरील समितीने पात्र केलेल्या कलाकारांची यादी विहित तपशीलासह संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचेकडे सादर करावी. त्यानंतर संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जिल्हाधिकारी यांच्याकडून शिफारस करण्यात आलेल्या पात्र लाभार्थ्यांच्या बँक खात्यात अनुज्ञेय अर्थसहाय्य वर्ग करतील.

- **पात्रता निकष व अटी -**
- महाराष्ट्र राज्यातील प्रयोगात्मक कलेतील केवळ कलेवर गुजराण असणारे आर्थिकदृष्टया दुर्बल कलाकार
- महाराष्ट्रात १५ वर्षे वास्तव्य
- कलेच्या क्षेत्रात १५ वर्षे कार्यरत
- वार्षिक उत्पन्न रुपये ४८,०००/- च्या कमाल मर्यादेत
- केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या वृध्द कलाकार मानधन योजनेतून मानधन घेणाऱ्या लाभार्थी कलाकारांना तसेच इतर वैयक्तिक शासकीय अर्थसहाय्याच्या योजनेचा लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.

**ब. समूह लोककलापथकांचे चालक/ मालक/ निर्माते यांनी एकरकमी विशेष कोविड अनुदान पॅकेजसाठी सादर करावयाची कागदपत्रे व निवड पध्दती**

समूह लोककलापथकांचे चालक/ मालक/ निर्माते यांच्या निवडीसाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्याकडून खालीलप्रमाणे निवड समिती तसेच सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या स्तरावर छाननी समिती गठीत करण्यात येईल. सदर निवडीसाठी संचालनालयाकडून वर्तमानपत्रातून जाहिरात प्रसारित करून पथकांकडून अर्ज मागविण्यात येतील. छाननी समितीमार्फत प्राप्त अर्जाची पडताळणी करून अर्ज संचालक, सांस्कृतिक कार्य यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीसमोर सादर करेल. त्यातून पात्र पथकांची अंतिम निवड, निवड समिती करेल व निवड झालेल्या संस्थांची नांवे शासनाकडे शिफारस करेल. शासनाकडून शासन निर्णय निर्गमित झाल्यावर अंतिम शिफारस करण्यात आलेल्या संस्थांच्या बँक खात्यात संचालनालयामार्फत रक्कम वर्ग करण्यात येईल.

- **निवड समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येईल.**

| | | |
|---|---|---|
| १. | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | अध्यक्ष |
| २. | प्रयोगात्मक कलेच्या क्षेत्रातील १० अशासकीय सदस्य | सदस्य |
| ३. | सहसंचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

- **अर्जदाराने जोडावायची कागदपत्रे**
- विहित नमुन्यातील अर्ज
- कंपनी कायदा किंवा सोसायटी कायदा, विश्वस्त कायद्यांतर्गत किंवा एमएसएमई अंतर्गत पथक नोंदणीचे प्रमाणपत्र
- कलापथकात काम करणा-या कलावंतांची नावे व पत्ते
- लोककलापथकांचे चालक/ मालक/ निर्माते यांचे आधार कार्ड व बँक खाते तपशील
- केवळ कलेवरच गुजराण असल्याचे तसेच एकरकमी कोविड दिलासा पॅकेजचा लाभ घेणार नसल्याचे व दिलेली माहिती खोटी आढळल्यास शासनाच्या अनुदान योजनेतून कायमस्वरूपी अपात्र करण्यात येईल, हे माहित असल्याचा उल्लेख असलेले प्रतिज्ञापत्र
- शाहिरी, खडीगंमत, दशावतार, झाडीपट्टी, संगीतबारी, तमाशा, टुरिंग टॉकीज, सर्कस, विधीनाटय पथकांसाठी, पथकाने आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान ५० कार्यक्रमांचे सादरीकरण केले असल्याबाबतचे किमान ५० आयोजकांची पत्रे/ हॅण्डबील /कार्यक्रम पत्रिका/ वर्तमानपत्रातील जाहिरात /बातमी/ ग्रामसेवक /सरपंच यांचे कार्यक्रम सादर केल्याचे प्रमाणपत्र

- संगीतबारीसाठी आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान १०० प्रयोग केल्याचे कलाकेंद्र प्रमुख/ आयोजकांची पत्रे/ हॅण्डबील /कार्यक्रम पत्रिका / वर्तमानपत्रातील जाहिरात /बातमी / ग्रामसेवक /सरपंच यांचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक.
- नाट्यसंस्थांसाठी आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान ३० प्रयोग केल्याची नाट्यगृह भाडेपावती, जाहिरात, तिकीट हे पुरावे जोडणे आवश्यक.

➢ **पात्रता निकष व अटी -**

- कंपनी कायदा / सोसायटी कायदा / विश्वस्त कायद्यांतर्गत तसेच M. S. M. E. अंतर्गत संस्था नोंदणीकृत असावी.
- मागील ५ वर्षापासून संस्था कार्यरत असावी.
- संस्थांनी आर्थिक वर्षात सन २०१७-१८, २०१८-१९ व २०१९-२० या ३ वर्षात वर नमूद केल्याप्रमाणे कार्यक्रमांचे / प्रयोगाचे सादरीकरण केलेले असावे.

➢ **योजना अंमलबजावणीची कालमर्यादा -**

१. शासन निर्णय पारीत झाल्याच्या दिनांकापासून ५ दिवसात स्थानिक वृत्रपत्र व इतर प्रसार माध्यमातून सोबत परिशिष्ट - क येथील विहित नमुन्यात जाहिरात देणे.

२. शासन निर्णय पारीत झाल्यावर जिल्हाधिकारी / संचालक यांनी १० दिवसात छाननी समिती व निवड समित्यांचे गठन करणे.

३. जाहिरात प्रकाशित झाल्यापासून १० दिवसात कलाकारांकडून विहित नमुन्यातील अर्ज मागविणे.

४. अर्ज प्राप्त झाल्यानंतर १० दिवसात छाननी समितीमार्फत छाननी करणे.

५. अर्ज छाननीनंतर १० दिवसाच्या आत निवड समित्यांच्या बैठका घेऊन कलाकारांची निवड करणे.

६. पात्र कलाकारांच्या निवड याद्या जिल्हाधिकारी कार्यालयाकडून सांस्कृतिक कार्य संचालनालयाकडे अर्थसहाय्यासाठी ५ दिवसात सादर करणे. तदनंतर सांस्कृतिक कार्य संचालनालयाकडून ५ दिवसात पात्र लाभार्थ्यांच्या बँक खात्यात अनुज्ञेय अर्थसहाय्य वर्ग करणे.

७. पात्र संस्थांच्या यादीची सांस्कृतिक कार्य संचालनालयाकडून शिफारस शासनास सादर करणे. शासनाकडून शासन निर्णय निर्गमित करणे, पात्र संस्थांच्या बॅकखात्यात अनुज्ञेय अर्थसहाय्य वर्ग करणे- १० दिवस.

*-*-*-*-*-*-*

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८८२०/प्र.क्र.१४७/सांका.४, दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१**

## परिशिष्ट - ब - १ एकल कलाकार (वैयक्तिक)

| कलाकाराचा पासपोर्ट आकाराचा अलिकडचा फोटो |
|---|

प्रति,

जिल्हाधिकारी

------------- जिल्हा

| | |
|---|---|
| १) लाभार्थी कलाकाराचे नांव | - |
| २) पत्ता | - |
| ३) जन्म दिनांक | - |
| ४) संपर्क क्रमांक | - |
| ५) राज्यातील वास्तव्य कधीपासून आहे | - |
| ६) आधार कार्ड क्रमांक | - |
| ७) लाभार्थी कलाकाराचा बँक खात्याचा तपशील व खाते क्रमांक | - |
| ८) कलेच्या क्षेत्रात किती वर्षापासून कार्यरत आहे | - |
| ९) लाभार्थी कलाकाराचे वार्षिक उत्पन्न | - |

## प्रतिज्ञापत्र

वर नमूद केलेली माहिती सत्य असून त्यामध्ये खोटी अथवा दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी माझी राहील. खोटी व दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास या योजनेअंतर्गत मिळालेल्या अर्थसहाय्याची शासनाकडून वसुली होऊन भविष्यात मला शासनाच्या कोणत्याही योजनांचे लाभ मिळणार नाहीत, याची मला जाणीव आहे.

कलाकाराची सही / अंगठा

(टीप :- सदर अर्ज संबंधित तालुक्याचे तहसिलदार मार्फत सादर करण्यात यावा.)

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८८२०/प्र.क्र.१४७/सांका.४, दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१**

## परिशिष्ट - ब - २

## कलाप्रकारातील संस्था / समुह / फड / पथक यांना अर्थसहाय्यासाठी अर्जाचा नमुना

प्रति,

१. संचालक,
सांस्कृतिक कार्य संचालनालय मुंबई.

२. सहायक संचालक, विभागीय कार्यालय,
पुणे, औरंगाबाद, नागपूर.

| | |
|---|---|
| १) संस्थेचे नांव | - |
| २) संस्थेच्या नोंदणीचा तपशील | - |
| ३) संस्था स्थापनेचे वर्ष | - |
| ४) संस्थेचा पत्ता | - |
| ५) संस्थेचा संपर्क क्रमांक | - |
| ६) संस्थेच्या कलाप्रकाराचे स्वरुप | - |
| ७) संस्थेच्या बँक खात्याचा तपशील | - |
| ८) सन २०१७-१८, २०१८-१९ व २०१९-२० या वर्षामध्ये आयोजित केलेल्या कार्यक्रमांची वर्षनिहाय संख्या | - |

### प्रतिज्ञापत्र

वर नमूद केलेली माहिती सत्य असून त्यामध्ये खोटी अथवा दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील. खोटी व दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास या योजनेअंतर्गत मिळालेल्या अर्थसहाय्याची शासनाकडून वसुली होऊन भविष्यात संस्थेला शासनाच्या कोणत्याही योजनांचे लाभ मिळणार नाहीत, याची जाणीव आहे.

संस्था / समुह / फड / पथक, यांच्या
अध्यक्ष / सचिवाची सही व शिक्का

(टीप :- सदर अर्ज सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई तसेच सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे, औरंगाबाद व नागपूर येथील क्षेत्रिय कार्यालयात सादर करण्यात यावा.)

## शासन निर्णय क्र. संकीर्ण ८८२०/प्र.क्र.१४७/सांका.४, दिनांक : ०३ नोव्हेंबर, २०२१

## परिशिष्ट – क

### जिल्हाधिकारी / संचालकांनी प्रसिध्द करावयाच्या जाहिरातीचा नमुना

कोविड-१९ च्या पार्श्वभूमीवर प्रयोगात्मक कलेवर अवलंबून असलेल्या कलाकार / संस्था यांना अर्थसहाय्य करण्याचा निर्णय घेतलेला आहे. सदर अर्थसहाय्य एकरकमी एकदाच पात्र लाभार्थ्यांना देण्यात येणार आहे. यास्तव सदर प्रयोगात्मक क्षेत्रातील एकल कलावंत तसेच समुह / फड / पथक यांनी खालीलप्रमाणे जाहिरात प्रसिध्द झाल्यापासून १० दिवसाच्या आत जिल्हाधिकारी / संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचेकडे अर्ज करावा, असे आवाहन करण्यात येत आहे.

**परिशिष्ट - ब - १ एकल कलाकार (वैयक्तिक)**

कलाकाराचा
पासपोर्ट आकाराचा
अलिकडचा फोटो

प्रति,
जिल्हाधिकारी
------------- जिल्हा

१) लाभार्थी कलाकाराचे नांव --
२) पत्ता --
३) जन्म दिनांक --
४) संपर्क क्रमांक --
५) राज्यातील वास्तव्य कधीपासून आहे --
६) आधार कार्ड क्रमांक --
७) लाभार्थी कलाकाराचा बँक खात्याचा तपशील व खाते क्रमांक --
८) कलेच्या क्षेत्रात किती वर्षापासून कार्यरत आहे --
९) लाभार्थी कलाकाराचे वार्षिक उत्पन्न --

**प्रतिज्ञापत्र**

वर नमूद केलेली माहिती सत्य असून त्यामध्ये खोटी अथवा दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी माझी राहील. खोटी व दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास या योजनेअंतर्गत मिळालेल्या अर्थसहाय्याची शासनाकडून वसुली होऊन भविष्यात मला शासनाच्या कोणत्याही योजनांचे लाभ मिळणार नाहीत, याची मला जाणीव आहे.

**कलाकाराची सही / अंगठा**

(टीप :- सदर अर्ज संबंधित तालुक्याचे तहसिलदार मार्फत सादर करण्यात यावा.)

**---------------- अर्जासोबत जोडावयाची कागदपत्रे ---------------**

- विहित नमुन्यातील अर्ज
- महाराष्ट्रात १५ वर्षे वास्तव्याचा रहिवासी दाखला (स्थानिक स्वराज्य संस्थेचाही दाखलाही ग्राहय)
- तहसिलदारांकडून प्राप्त उत्पन्नाचा दाखला
- कलेच्या क्षेत्रात १५ वर्षे कार्यरत असल्याबाबतचे पुरावे
- आधार कार्ड व बँक खाते तपशील
- शिधापत्रिका सत्यप्रत

**----------------- पात्रता निकष व अटी -------------------**

- महाराष्ट्र राज्यातील प्रयोगात्मक कलेतील केवळ केलेवर गुजराण असणारे आर्थिकदृष्टया दुर्बल कलाकार
- महाराष्ट्रात १५ वर्षे वास्तव्य
- कलेच्या क्षेत्रात १५ वर्षे कार्यरत
- वार्षिक उत्पन्न रुपये ४८,०००/- च्या कमाल मर्यादेत
- केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या वृध्द कलाकार मानधन योजनेतून मानधन घेणाऱ्या लाभार्थी कलाकारांना तसेच इतर वैयक्तिक शासकीय अर्थसहाय्यच्या योजनेचा लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही.
- वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिध्द झाल्यानंतर दहा दिवसात अर्ज करावा.

**परिशिष्ट - ब - २ कलाप्रकारातील संस्था / समुह / फड / पथक यांना अर्थसहाय्यासाठी अर्जाचा नमुना**

प्रति,
संचालक,
सांस्कृतिक कार्य संचालनालय मुंबई.

१) संस्थेचे नांव --
२) संस्थेच्या नोंदणीचा तपशील --
३) संस्था स्थापनेचे वर्ष --
४) संस्थेचा पत्ता --
५) संस्थेचा संपर्क क्रमांक --
६) संस्थेच्या कलाप्रकाराचे स्वरुप --
७) संस्थेच्या बँक खात्याचा तपशील --
८) सन २०१७-१८, २०१८-१९ व २०१९-२० या वर्षामध्ये आयोजित केलेल्या कार्यक्रमांची वर्षनिहाय संख्या --

**प्रतिज्ञापत्र**

वर नमूद केलेली माहिती सत्य असून त्यामध्ये खोटी अथवा दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील. खोटी व दिशाभूल करणारी माहिती / कागदपत्रे सादर केल्यास या योजनेअंतर्गत मिळालेल्या अर्थसहाय्याची शासनाकडून वसुली होऊन भविष्यात संस्थेला शासनाच्या कोणत्याही योजनांचे लाभ मिळणार नाहीत, याची जाणीव आहे.

**संस्था/समुह/फड/पथक, यांच्या अध्यक्ष व सचिवाची सही व शिक्का**

(टीप :- सदर अर्ज सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई तसेच सांस्कृतिक कार्य संचालनालय, पुणे, औरंगाबाद व नागपूर येथील क्षेत्रिय कार्यालयात सादर करण्यात यावा.)

**----------------------- अर्जदाराने जोडावयाची कागदपत्रे --------------------**

- विहित नमुन्यातील अर्ज
- कंपनी कायदा किंवा सोसायटी कायदा किंवा विश्वस्त कायद्यांतर्गत किंवा M.S.M.E. नोंदणीचे प्रमाणपत्र
- कलापथकात काम करणाऱ्या कलावंतांची नांवे व पत्ते
- लोककलापथकांचे चालक/मालक/निर्माते यांचे आधारकार्ड व बँकखाते तपशील
- केवळ कलेवरच गुजराण असल्याचे तसेच एकरकमी कोविड दिलासा पॅकेजचा लाभ घेणार नसल्याचे व दिलेली माहिती खोटी आढळल्यास शासनाच्या अनुदान योजनेतून कायमस्वरुपी अपात्र करण्यात येईल, हे माहित असल्याचा उल्लेख असलेले प्रतिज्ञापत्र
- शाहिरी, खडीगंमत, दशावतार, झाडीपट्टी, संगीतबारी, तमाशा, टुरिंग टॉकीज, सर्कस, विधीनाटय, पथकांसाठी पथकाने आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान ५० कार्यक्रमांचे सादरीकरण केले असल्याबाबतचे किमान ५० आयोजकांचे पत्रे/हॅण्डबील/कार्यक्रम पत्रिका/वर्तमान पत्रातील जाहिरात/ बातमी/ ग्रामसेवक/ सरपंच यांचे कार्यक्रम सादर सादर केल्याचे प्रमाणपत्र
- संगीतबारीसाठी आर्थिका वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान १०० प्रयोग केलचे कलाकेंद्र प्रमुख/आयोजकांचे पत्रे/हॅण्डबील/ कार्यक्रम पत्रिका/वर्तमानपत्रातील जाहिरात/ बातमी/ ग्रामसेवक/सरपंच यांची प्रमाणपत्र जोडणे आवश्यक
- नाटयसंस्थांसाठी आर्थिक वर्ष २०१७-१८ पासून किमान तीन वर्षे सातत्याने दरवर्षी सरासरी किमान ३० प्रयोग केल्याचे नाटयगृह भाडेपावती, जाहिरात, तिकीट हे पुरावे जोडणे आवश्यक

**-------------- पात्रता निकष व अटी -----------------**

- कंपनी कायदा/सोसायटी कायदा/विश्वस्त कायद्यांतर्गत तसेच M.S.M.E. अंतर्गत संस्था नोंदणीकृत असावी.
- मागील ५ वर्षापासून संस्था कार्यरत असावी.
- संस्थांनी आर्थिक वर्षात सन २०१७-१८, २०१८-१९ व २०१९-२० या ३ वर्षात वर नमूद केल्याप्रमाणे कार्यक्रमांचे/प्रयोगांचे सादरीकरण केलेले असावे.
- वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिध्द झाल्यानंतर दहा दिवसात अर्ज करावा.

**अर्ज कोणाकडे करावा :-**

१. वैयक्तिक कलाकारांनी संबंधित तालुक्याच्या तहसीलदारामार्फत अर्ज सादर करावेत.
२. समूह/संस्था/फड/पथके यांनी सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या मुख्यालयात किंवा पुणे/नागपूर/औरंगाबाद येथील विभागीय कार्यालयांमार्फत अर्ज सादर करावा.

**महत्वाची टीप :**

१. अर्ज सादर करण्याची प्रक्रिया संपूर्णपणे विनामुल्य असून अर्जदाराला अर्जासोबत कोणत्याही प्रकारचे शुल्क भरण्याची आवश्यकता नाही.
२. अर्ज भरुन घेण्यासाठी शासनाने कोणत्याही खाजगी व्यक्ती/संस्था/संघटना यांची नेमणूक केलेली नाही.
३. अधिक माहितीसाठी https://www.mahasanskruti.org या संकेतस्थळाला भेट द्यावी.